**मागासवर्गीय सर्वोदय बहुउद्देशिय शिक्षण प्रशिक्षण संस्था, नागपूर संचलित साऊथ वेस्ट पॉईंट इंग्रजी प्राथमिक शाळा, सोमलवाडा, ता.जि.नागपूर या शाळेचे हिराबाई गायकवाड शिक्षण संस्था, पोही, ता.कळमेश्वर, नागपूर या संस्थेस हस्तांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशाह ३०१९/प्र.क्र.३२९/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२०

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

संदर्भ : विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे जा.क्र.प्राथ/ब/९८६९/२०१८, दिनांक २६ ऑक्टोबर, २०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :**

मागासवर्गीय सर्वोदय बहुउद्देशिय शिक्षण प्रशिक्षण संस्था, नागपूर संचलित साऊथ वेस्ट पॉईंट इंग्रजी प्राथमिक शाळा, सोमलवाडा, ता.जि.नागपूर या इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित प्राथमिक शाळेचे, स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर हिराबाई गायकवाड शिक्षण संस्था, पोही, ता.कळमेश्वर, नागपूर या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर शाळेचे, हिराबाई गायकवाड शिक्षण संस्था, पोही, ता.कळमेश्वर, नागपूर या संस्थेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) सदर शाळेच्या हस्तांतरणास मागासवर्गीय सर्वोदय बहुउद्देशिय शिक्षण प्रशिक्षण संस्था, नागपूर संस्थेच्या अद्ययावत परिशिष्ट-१ मधील अध्यक्ष व सर्व सदस्यांची संमती असल्याची विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी लेखी खात्री (नोटराईज्ड बंधपत्रावर) करून घेणे आवश्यक राहील.

(२) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथिल केली जाणार नाही.

(३) हस्तांतरण करून घेणाऱ्या संस्थेने मान्य केल्याप्रमाणे सदर शाळा स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर कार्यरत राहील. सबब शाळेत कार्यरत शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(४) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(५) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(६) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(७) सदरहू व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. वरील अट क्रमांक (१) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी बाबी तपासून शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत ४ आठवडयात पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२८१५४७०१३४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.02.28 15:52:34 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, नागपूर
४) अध्यक्ष/ सचिव, मागासवर्गीय सर्वोदय बहुउद्देशिय शिक्षण प्रशिक्षण संस्था, नागपूर
५) अध्यक्ष/ सचिव, हिराबाई गायकवाड शिक्षण संस्था, पोही, ता.कळमेश्वर, नागपूर
६) निवडनस्ती ( एसएम-१).